आदिवासी उपयोजना क्षेत्रात काम करणा-या अधिकारी व कर्मचारी यांना प्रोत्साहन भत्ता देणे...

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक:आस्था-१७०१/प्र.क्र.११४/का.१५,**
**मंत्रालय विस्तार, मुंबई- ४०० ०३२.**
**दिनांक : १७ मार्च, २००३.**

वाचा : (१) शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग क्रमांक आस्था-१०९७/ प्र.क्र.१८/ का.१५ दिनांक ५ फेब्रुवारी, १९९९.
(२) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक टिआरएफ-२०००/प्र.क्र.३/ बारा, दिनांक ६ ऑगस्ट, २००२.
(३) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक टिआरएफ-२०००/प्र.क्र.३/ बारा, दिनांक ५ सप्टेंबर, २००२.

**शासन निर्णय :-**

आदिवासी उपयोजना क्षेत्रात काम करणाऱ्या अधिकारी/ कर्मचारी यांना उक्त क्र. १ येथे नमूद दिनांक ५ फेब्रुवारी, १९९९ च्या शासन निर्णयान्वये त्यात नमूद अटी व शर्तींच्या अधिन राहून दिनांक ३१ मार्च, २००२ पर्यंत प्रोत्साहन भत्ता देण्यात येत होता. सदर प्रोत्साहन भत्ता दिनांक ५ फेब्रुवारी, २००२ च्या शासन निर्णयातील अटी/ शर्ती व दराने दिनांक १ एप्रिल, २००२ ते ५ ऑगस्ट, २००२ या कालावधीसाठी अदा करण्यास शासन मंजूरी देत आहे. दिनांक ६ ऑगस्ट, २००२ पासून पुढील कालावधीसाठी प्रोत्साहन भत्ता वर क्र. २ येथे नमूद सामान्य प्रशासन विभागाच्या दिनांक ६.८.२००२ च्या शासन निर्णयातील परिच्छेद २ (ब) व (क) नुसार सुधारणा करण्यात आल्याप्रमाणे अनुज्ञेय राहिल. हा प्रोत्साहन भत्ता शासनाचे पुढील आदेश होईपर्यंत अनुज्ञेय राहिल.

२. प्रोत्साहन भत्ता या योजनेस दिनांक १ एप्रिल, २००२ पासून मुदतवाढ त्या योजनेस होणाऱ्या खर्चाची आकडेवारी तसे त्या योजनेच्या उपयुक्ततेबाबत आढावा घेण्याच्या अटीवर देण्यात आली आहे. त्यामुळे उक्त दिनांक ५/२/१९९९ व ६/०८/२००२ च्या शासन निर्णयानुसार ज्या कार्यालयातील कर्मचाऱ्यांना प्रोत्साहन भत्ता अनुज्ञेय होतो त्या कार्यालय प्रमुखांनी त्या कार्यालयाची प्रोत्साहन भत्त्यावर होणाऱ्या खर्चाची आकडेवारी संबंधित विभागप्रमुखांकडे पाठवावी. विभागप्रमुखांनी सर्व कार्यालयांची आकडेवारी एकत्रित करुन विवरणपत्र "अ" मध्ये ती संबंधित प्रशासकीय विभागामार्फत प्रधान सचिव, आदिवासी विकास विभाग यांना सादर करावी. सदर आकडेवारी उशिरात उशिरा दिनांक ३० एप्रिल, २००३ पर्यत सबंधित प्रशासकीय विभागामार्फत या विभागास प्राप्त होईल या बेताने याबाबत कार्यवाही अपेक्षित आहे.

३. प्रोत्साहन भत्त्यासाठी होणारा खर्च संबंधित अधिकारी/कर्मचारी यांचे वेतन व भत्ते ज्या तरतूदीतून भागविले जातात त्या विभागाच्या तरतूदीतून भागविण्यात यावा व संबंधित लेखाशिर्षाखाली खर्ची टाकावा.

४. महाराष्ट्र जिल्हा परिषदा व पंचायत समित्या अधिनियम १९६१ (सन १९६२ चा महाराष्ट्र अधिनियम क्र. ५) मधील कलम २४८ च्या परंतुका अन्वये प्रदान केलेले अधिकार व त्या संबंधातील इतर सर्व अधिकार यांचा

वापर करुन शासन असा आदेश देत आहे की, जिल्हा परिषदांकडील कर्मचाऱ्यांना/ अधिकाऱ्यांना हे आदेश योग्य त्या फेरफारासह लागू करण्यात येत आहेत.

५. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या संमतीने व त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्र. १०१४/ सेवा-५ दिनांक १०.१०.२००२ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,**

**( अ. नि. कुलकर्णी )**
**उप सचिव**

**विवरणपत्र - अ**

विभाग प्रमुखांचे नांव :-
संबंधित प्रशासकीय विभागाचे नांव :-

- प्रोत्साहन भत्त्यावर होत असलेल्या खर्चाची आकडेवारी-

| आदिवासी उपयोजना क्षेत्रातील कार्यालयांची संख्या | अधिकारी/ कर्मचारी , प्रकार/गट | अधिकारी/ कर्मचारी संख्या. | प्रोत्साहन भत्त्यावरील खर्च. | दरमहा एकूण. | वार्षिक. |
|---|---|---|---|---|---|
| | अ | | | | |
| | ब | | | | |
| | क | | | | |
| | ड | | | | |